**समावेशन सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) गट - ब , महाराष्ट्र अभियांत्रिकी सेवा वर्ग-२**

**-------------------------------------**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
**मंत्रालय , मुंबई - ४०० ०३२**
**शासन परिपत्रक क्रमांक :- नियुक्ती २०११/(४०/२०११)/आ (स.अ.श्रेणी-२)**
**दिनांक :- ३०. १२.२०११**

**संदर्भ -** महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई यांचे क्रमांक :- १०६८/१०५२३/दोन, दिनांक २३.१२.२०११ चे पत्र.

## शासन परिपत्रक

शासन अधिसूचना क्रमांक एमएससी १००८ / (७३ / २००८ ) /आ (सं.नि.) दिनांक ८ जूलै, २००९ अवये **सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य)** संवर्गाच्या दिनांक १६ जून, १९९७ रोजी अधिसूचित झालेल्या सेवा प्रवेश नियमातील नियम क्रमांक ८ मध्ये शासनाकडून सुधारणा करण्यात आलेली असून, शासन सेवेत दि. १ एप्रिल, १९८१ ते दि. १६ जून , १९९७ पर्यंत नियुक्त / दर्जा प्राप्त सहायक अभियंता श्रेणी-२ यांच्या सेवा नियमित करण्याच्या अनुषंगाने, तोंडी परिक्षेच्या आधारे नियुक्त्या नियमित करण्याची तरतूद सदर नियमात करण्यात आलेली आहे. त्यानुसार महाराष्ट्र लोकसेवा आयोगामार्फत सन २००९-२०१० मध्ये किंवा त्यानंतर लगेच घेतल्या जाणा-या समावेशन परिक्षेव्दारे संबंधीत अभियंता यांनी अर्हता प्राप्त करणे आवश्यक आहे. त्या अनुषंगाने संबंधित अभियंत्यांना शासन सेवेत सामावून घेण्यासाठी शासनाकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावानुसार प्रथम संधी म्हणून आयोगामार्फत माहे- सप्टेंबर / ऑक्टोबर - २०१० मध्ये मौखिक परीक्षा घेण्यात आली. सदर मौखिक परीक्षेचा निकाल नोव्हेंबर, २०१० मध्ये आयोगाने जाहीर केला आहे. **त्यामध्ये अर्हता प्राप्त केलेले नाही असे अभियंते, सदर परिक्षेला अनुपस्थित राहिलेले अभियंते आणि सन - २०१० च्या मौखिक परिक्षेचे आवेदनपत्र सादर न केलेले अभियंते अशा अभियंत्यांच्या सेवा नियमित करण्यासाठी दुसरी संधी देण्याकरीता महाराष्ट्र लोकसेवा आयोगाने सन-२०११ च्या मौखिक परिक्षेचा कार्यक्रम जाहीर केला आहे .**

**२.** या संदर्भात संबंधित अभियंत्यांच्या मार्गदर्शनासाठी व कार्यवाहीसाठी पुढील सूचना देण्यात येत आहेत.

२.१ सदर समावेशन परीक्षेसाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडे ऑन लाईन अर्ज करणे आवश्यक आहे.

२.२ सर्व संबंधित कर्मचा-यांनी स्वत:ची शैक्षणिक पात्रता, वय, जात/ जमात व निवास इत्यादी बाबतच्या नोंदी मूळ कागदपत्रांबरोबर पडताळूनच आयोगास सादर कराव्यात.

**३.** प्रस्तुत परिपत्रकामध्ये समावेशन परीक्षेसंबधी संक्षिप्त तपशिल दिलेला आहे. अर्ज करण्याची पध्दत, आवश्यक अर्हता, शुल्क, इत्यादींबाबतच्या सविस्तर तपशिलासाठी आयोगाच्या www.mpsc.gov.in या वेबसाईटवरील सरळ सेवा भरती अंतर्गत उमेदवारांना सर्वसाधारण सूचना मध्ये उपलब्ध करून देण्यात आलेल्या माहितीचे कृपया अवलोकन व्हावे. आयोगाच्या

वेबसाईटवर प्रसिध्द करण्यात आलेली माहिती अधिकृत समजण्यात येईल. प्रस्तुत परिपत्रक आयोगाच्या वेबसाईटवर उपलब्ध आहे.

४. अर्ज करण्याची पध्दत:-

४.१ प्रस्तुत परीक्षेसाठी अर्ज फक्त ऑनलाईन पध्दतीने स्वीकारण्यात येतील. इतर कोणत्याही प्रकारे अर्ज स्वीकारण्यात येणार नाहीत.

४.२ पात्र उमेदवाराला वेब-बेस्ड (Web- based) ऑनलाईन अर्ज www.mpsconline.gov.in या वेबसाईटद्वारे दि. २ जानेवारी, २०१२ ते २३ जानेवारी, २०१२ या कालावधीत सादर करणे आवश्यक राहील.

४.३ ऑन लाईन पध्दतीने अर्ज सादर करण्याच्या सविस्तर सूचना आयोगाच्या www.mpsconline.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध आहेत. तसेच ऑन लाईन पध्दतीने अर्ज भरण्याचे प्रात्यक्षिक (Demo) सदर वेबसाईटवर पाहता येईल.

४.४ विहित पध्दतीने अर्ज सादर करण्याची तसेच भारतीय स्टेट बँकेमध्ये परीक्षा शुल्क भरण्याची संपूर्ण कार्यवाही आयोगाने विहित केलेल्या कालावधीतच पूर्ण करणे आवश्यक आहे.

४.५ ऑनलाईन पध्दतीने अर्ज सादर करताना उमेदवाराजवळ स्वत:चा अद्यायावत (Latest) फोटो (रुंदी ३.५ से.मी. x उंची ४.५ से.मी.) व स्वत:चा ईमेल आयडी असणे आवश्यक आहे. तसेच स्वत:ची स्वाक्षरी व स्वत:चा फोटो आयोगाच्या सूचनेनुसार विहित पध्दतीने स्कॅने करुने अपलोड करणे अनिवार्य आहे.

४.६ उमेदवारांनी आयोगाच्या www.mpsconline.gov.in या वेबसाईटवर स्वत:च्या यूजर आयडी व पासवर्डद्वारे प्रवेश (Login) केल्यानंतर Apply Exam / Post या बटणावर क्लिक करावे. त्यानंतर सहायक अभियंता (स्थापत्य) श्रेणी २ समावेशन परीक्षा -२०११ वर Apply केल्यावर दिनांक व ठिकाण नमूद केल्यानंतर Submit to MPSC वर क्लिक करुन आयोगास माहिती सादर करावी.

४.७ वरीलप्रमाणे आयोगास माहिती सादर केल्यानंतर विहित परीक्षा शुल्काचा भरणा करण्यासाठी Print Challan या बटनावर क्लिक करावे व चलनाची प्रत घ्यावी. सदर चलनावर नमूद केल्याप्रमाणे आवश्यक परीक्षा शुल्क चलनासह भारतीय स्टेट बँकेच्या कोणत्याही शाखेत बँकेच्या कार्यालयीन वेळेत रोखपालाकडे सादर करावी व बँकेकडून त्याचवेळी चलनाची प्रत घ्यावी.

४.८ विहित पध्दतीने अर्ज सादर करुन बँकेमध्ये चलनाद्वारे शुल्क भरल्यावर, दोन कार्यालयीन कामकाजाच्या दिवसानंतर (Working Days) उमेदवारांच्या मोबाईल क्रमांकावर आयोगास रक्कम प्राप्त झाल्याबाबतचा (Transaction ID Updated Successfully) एस.एम.एस. आयोगाकडून पाठविण्यात येईल. तसेच उमेदवाराच्या प्रोफाईलमध्ये Application Status द्वारे रक्कम प्राप्त झाल्याबाबत सूचना प्राप्त होईल.

४.९ चलनाद्वारे शुल्क भरल्यानंतर बँकेकडून Transaction ID प्राप्त होईल. दोन कार्यालयीन कामकाजाच्या दिवसानंतर आयोगाकडून एस.एम.एस. प्राप्त न झाल्यास अथवा प्रोफाईलद्वारे सूचना प्राप्त न झाल्यास चलनावर उपलब्ध करुन देण्यात आलेल्या Transaction ID ची नोंद पुन्हा ऑनलाईन पध्दतीने अचूकरित्या करावी. Transaction ID ची नोंद

अचूकरित्या होत नसेल अथवा तांत्रिक अडचण उद्‌भवत असेल तर ऑनलाईन प्रणालीच्या Feedback द्वारे Registration ID , Transaction ID चलनावरील बँकेत रक्कम भरल्याचा दिनांक आयोगास पाठवावा. बँकेकडून प्राप्त झालेल्या Transaction ID व चलनावरील बँकेत रक्कम भरल्याचा दिनांक आयोगास पाठवावा. बँकेकडून प्राप्त झालेल्या Transaction ID ची नोंद अचूकपणे झाली असल्याबाबत खात्री करण्याची जबाबदारी उमेदवाराची राहील.

४.१० ऑनलाईन पध्दतीने अर्ज केल्यानंतर अर्जाची छायांकित प्रत व सोबतच्या परिशिष्ट - अ मधील नमून्यात प्रमाणपत्र दि. १० फेब्रुवारी, २०१२ पर्यंत शासनाच्या संबंधित विभागामार्फत आयोगास सादर करणे आवश्यक राहील. त्याशिवाय अर्ज विचारात घेतला जाणार नाही.

**४.११ ऑनलाईन पध्दतीने अर्ज सादर केल्यावर संबंधित उमेदवाराने अर्जाची प्रत त्यांच्या मूळ नियुक्ती व सहाय्यक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) पदावरील नियुक्तीच्या प्रती सेवापुस्तकातील पहिल्या पानाची व नियुक्तीच्या नोंदीची प्रत, मागासवर्गीय कर्मचा-यांच्या बाबतीत जात वैधता प्रमाणपत्राची प्रत , शैक्षणिक अर्हतेचे प्रमाणपत्र नियुक्तीच्या आदेशांच्या प्रतीसह शासनाकडे विभाग प्रमुखामार्फत तात्काळ सादर करावेत. दि. २४ जानेवारी, २०१२ नंतर प्राप्त झालेले अर्ज विचारात घेतले जाणार नाहीत.**

४.१२ विहित पध्दतीने अर्ज भरुन परीक्षा शुल्क भरण्यासाठी चलनाची प्रत घेण्याची कार्यवाही दि. २३ जानेवारी, २०१२ रोजी २३.५९ वाजेपर्यंत पूर्ण करणे आवश्यक आहे. त्यानंतर सदर वेबलिंक बंद होईल.

४.१३ चलनाद्वारे शुल्क भारतीय स्टेट बँकेमध्ये दि. २४ जानेवारी, २०१२ पर्यंत बँकेच्या कार्यालयीन वेळेत भरणे आवश्यक राहील. विहित दिनांकापर्यंत परीक्षा शुल्क भरण्याची कार्यवाही पूर्ण न केल्यास मुलाखतीस प्रवेश मिळू शकणार नाही.

५. शुल्क :-

५.१ (१) अमागास-४१०/- (२) मागासवर्गीय २१०/-

५.२ सदर शुल्क ऑनलाईन अर्जांची नोंदणी केल्यावर प्राप्त होणा-या विहित चलनाद्वारे भारतीय स्टेट बॅंकेच्या कोणत्याही शाखेमध्ये कार्यालयीन वेळेत रोखीने भरावे लागेल.

५.३ एकदा भरलेले परीक्षा शुल्क कोणत्याही परिस्थितीत परत केले जाणार नाही.

६. प्रस्तुत सहायक अभियंता, श्रेणी-२ गट-ब पदाच्या सेवाप्रवेश नियमातील तरतूदीनुसार नियुक्तीसाठी पात्र असलेले अभियंते सदर मुलाखतीस पात्र असतील. नेमणूकीस पात्र असलेल्या अभियंत्यांनी मुलाखतीस स्वखर्चाने उपस्थित राहणे आवश्यक आहे. मुलाखतीस उपस्थित न राहणा-या अधिका-यांच्या अस्थायी नेमणूकांना आयोगाची मान्यता मिळणार नाही. तसेच **शासन अधिसूचना क्रमांक एमएससी १००८ / (७३ / २००८ ) /आ (सं.नि.) दिनांक ८ जूलै, २००९ अन्वये, सदर मौखिक परीक्षा ही उमेदवारांची दुसरी संधी आहे. याची नोंद घ्यावी.**

७. सदर पदावरील नियुक्त्या समावेशनाने नियमित करण्याची बाब प्रस्तुत प्रकरणी यायप्रविष्ट असलेल्या श्रीमती सुनिता दौलतराव पाटील यांनी मा. सर्वोच्च यान्यालयात दाखल केलेल्या SLP क्र. १००८३/२०१० व अन्य न्यायालयात न्यायप्रविष्ट प्रकरणांच्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहील.

८. प्रस्तुत पदाच्या मुलाखती मुंबई येथे महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या बॅक ऑफ इंडिया इमारत, तिसरा माळा , महात्मा गांधी मार्ग, हुतात्मा चौक, मुंबई-४०० ००१ येथील कार्यालयात घेण्यात येतील. मुलाखतीचा दिनांक व वेळ संबंधितांना आयोगाकडून उमेदवारांच्या प्रोफाईलद्वारे उपलब्ध करुन देण्यात येईल. तसेच, याबाबतची माहिती संबंधित उमेदवारांना ईमेल द्वारे व मोबाईलवर एसएमएस द्वारे कळविण्यात येईल.

९. अर्जात नमूद केलेल्या माहितीच्या आधारे उमेदवार परिपत्रकातील विहित अर्हतेबाबतच्या अटींची पूर्तता करतात असे समजून पात्रता न तपासता आयोगाकडून त्यांना मुलाखतीस तात्पुरता प्रवेश दिला जाईल. परंतु मुलाखतीपूर्वी अथवा मुलाखतीनंतर कोणत्याही टप्प्यावर , उमेदवाराने अर्जात नमूद केलेली माहिती चुकीची वा खोटी असल्याचे अथवा उमेदवार विहित अर्हतेची पूर्तता करीत नसल्याचे आयोगास आढळल्यास अशा उमेदवारांची उमेदवारी कोणत्याही टप्प्यावर रद्द करण्यात येईल आणि त्याबाबतचा आयोगाचा निर्णय अंतिम राहील.

१०. सहायक अभियंता श्रेणी-२ (स्थापत्य) संवर्गाची सेवाजेष्ठता **शासन अधिसूचना क्रमांक एमएससी १००८ / (७३ / २००८ ) /आ (सं.नि.) दिनांक ८ जूलै, २००९ मधील तरतुर्दीनुसार व मा. सर्वोच्च न्यायालयातील SLP क्रमांक १००८३/२०१० श्रीमती सुनिता पाटील विरुध्द महाराष्ट्र शासन मधील अंतिम निकालानुसार** निश्चित करण्यात येईल.

११. आयोगाचे अध्यक्ष , सदस्य किंवा अधिकारी यांच्यावर प्रत्यक्ष वा अप्रत्यक्ष दडपण आणण्याचा कोणताही प्रयत्न केल्यास अशा उमेदवारास आयोगाच्या निवडीपासून अपात्र ठरविण्यात येईल.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१११२३००८३७२५१२२५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने

मुनिधुरी

**( मु. नि. धुरी )**
शासनाच्या अवर सचिव

प्रत,

सर्व महासंचालक,
सर्व कार्यकारी संचालक
सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग,
प्रधान सचिव, (सेवा) सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय , मुंबई
सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय , मुंबई
सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग (पत्राने),
सर्व अधीक्षक अभियंता , जल संपदा विभाग
आ. (तांत्रिक)/आ. (वर्ग-२)/आ. (संनि)/आ/(वर्ग-१) कार्यासने,
आ. (स.अ. श्रेणी-२),

निवड धारिका,

# परिशिष्ट - अ

## (उपसचिव(प्रशा)/अवर सचिव(राकसे), जलसंपदा विभाग यांचेकडून उमेदवारांनी पात्रतेसंबंधी प्राप्त करावयाचे प्रमाणपत्र )

प्रमाणित करण्यात येते की, श्री /श्रीमती / कु. ..................................... यांची जलसंपदा विभागात मूळ नियुक्ती * कनिष्ठ अभियंता या पदावर दिनांक.................................... झाली असून शासन आदेश / निर्णय क्रमांक. .........................................., दिनांक...................... अवये, त्यांना ३/८ सेवेचा लाभ देऊन सहाय्यक अभियंता श्रेणी -२ (स्थापत्य) या पदाचा मानिव दिनांक ....................... असा देण्यात आला आहे. / * जलसंपदा विभागात सहायक अभियंता श्रेणी -२ (स्थापत्य) या पदावर तदर्थ नियुक्ती आदेश क्रमांक ........................ दिनांक ....................... असा असून ते दिनांक .................... रोजी सेवेत रुजू झाले आहेत. (सोबत नियुक्ती आदेशाची प्रत जोडली आहे.)

२. शासन अधिसूचना क्रमांक एमएससी - १००८/(७३/२००८) आ (सं.नि.), दिनांक ८.७.२००९ अन्वये या कार्यालयाच्या उपलब्ध सेवा तपशीलानुसार सहाय्यक अभियंता श्रेणी -२ (स्थापत्य) पदाच्या सुधारीत सेवा प्रवेश नियमानुसार श्री / श्रीमती ................................ महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मौखिक परिक्षेच्या दुस-या संधीसाठी पात्र आहेत. (यापूर्वी परीक्षा दिलेली असल्यास, मौखिक परीक्षा-१९९७/२०१० मधील मुलाखत क्र. ....... असा आहे.)

३. शासकीय अभिलेख्यानुसार त्यांची जन्मतारीख ....................... आहे. आयोगाच्या जाहीरातीतील तरतूदीनुसार ते सन २०१०-११ ला वयाधिक होत असले तरी या पदाच्या सेवा प्रवेश नियमावलीतील नियम ८ मधील तरतूदी नुसार कमाल वयोमर्यादेची अट शिथिल करुन ते सदर मौखिक परीक्षेस पात्र आहेत.

४. वरील माहिती सदर अभियंत्याच्या सेवा पुस्तकाच्या नोंदी व उपलब्ध अभिलेखावरुन तपासली असून ही माहिती बिन चूक आहे. तसेच त्यांचे गोपनीय अहवाल समाधानकारक आहेत.

* लागू नसेल ते खोडावे.

**दिनांक :-** **स्वाक्षरी**

**ठिकाण :-** **सही व पदनाम**

**उपसचिव(प्रशासन)/अवर सचिव(राकसे),**
**जलसंपदा विभाग, महाराष्ट शासन,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**

प्रत:

सचिव,
महाराष्ट्र लोकसेवा आयोग,
मुंबई यांना माहितीसाठी व यो ग्य त्या कार्यवाहीसाठी अगेषित.